# जॉनी ॲपलसीड

## पेरतो सफरचंदाच्या बिया



# जॉनी ॲपलसीड

## पेरतो सफरचंदाच्या बिया



जॉन चॅपमन हा अमेरिकन लोकनायक झालेला एक खराखुरा माणूस. कोणे एके काळी त्यानं देशात सगळीकडे सफरचंदाच्या बागा लावल्या. म्हणून त्याला जॉनी ॲपलसीड असं टोपणनाव पडलं.

दंतकथा म्हणजे एखादी अद्भूत कहाणी असते. वर्षानुवर्षं परत परत सांगत आल्यानं तिच्यात बऱ्याच गोष्टी वाढवून सांगितलेल्या असतात. त्यात सांगितलेल्या काही घटना कदाचित कधी घडल्याही नसतील. पण माणसं आणि प्राण्यांविषयी जॉनीला विशेष जिव्हाळा होता हे मात्र खरंय. अमेरिकेतल्या रानावनांवर त्याचं खरंखुरं प्रेम होतं.

जॉनी ॲपलसीडचं खरं नाव होतं जॉनी चॅपमन. जिथे जाईल तिथे त्यानं सफरचंदाच्या बिया पेरल्या. म्हणून तर त्याला जॉनी ॲपलसीड असं टोपणनाव पडलं.



जॉनीचा जन्म २६ सप्टेंबर १७७४ मध्ये मॅसेच्युसेट्स इथे झाला. त्याचे वडील शिकारी होते. जॉनीला शेतीच्या कामात मदत करायला खूप आवडायचं.



सफरचंदाच्या बागेची देखभाल करणं हे जॉनीचं अगदी आवडीचं काम. सफरचंदाच्या झाडावर चढून ते लालबुंद, चमकतं फळ तोडायला त्याला भारी आवडे.



जॉनी तरुण असताना बरीच माणसं पश्चिमेकडच्या ओहायो आणि अशाच इतर दूरच्या ठिकाणी जाऊन राहायला लागली. सगळ्यात पहिल्यांदा तिकडे राहायला लागलेल्या या लोकांना घरं बांधण्यासाठी आणि शेती करण्यासाठी तिथली झाडं तोडावी लागली. सफरचंदाची झाडं लावायला त्यांच्याकडे वेळच नव्हता.



या लोकांकडे सफरचंदाची झाडं नाहीत हे ऐकल्यावर जॉनीला खूप वाईट वाटलं. वसंत ऋतूत सफरचंदाच्या झाडाला फुटणारी सुंदर गुलाबी पालवी या लोकांना बघता यावी असं त्याला वाटे. हेमंतात रसरशीत, चवदार सफरचंद खायला त्यांना किती मज्जा येईल हे त्याला माहीत होतं आणि थंडीच्या दिवसात गरमागरम ॲपल पाय खायला किती आवडेल हेही ठाऊक होतं.

“मलाच या लोकांना मदत करायचा उपाय शोधला पाहिजे,” जॉनी स्वतःशीच म्हणाला.







ओहायोला जाणाऱ्या प्रत्येक कुटुंबाकडे एक सफरचंदाचं झाड देण्याचा जॉनीचा बेत होता. पण स्थलांतर करणाऱ्या लोकांच्या गाड्या अगोदरच गरजेच्या वस्तूंनी भरून गेल्या होत्या. झाड नेण्याइतकी जागा कोणाकडेच नव्हती.

मग जॉनीला एक मस्त कल्पना सुचली. त्यानं त्या माणसांबरोबर सफरचंदाच्या बिया द्यायचं ठरवलं. सफरचंद खाल्लं की त्यातल्या बिया तो जपून ठेवायला लागला. मग त्या बिया त्यानं चामड्याच्या थैल्यांमध्ये भरल्या आणि आपल्या शेतावरून जाणाऱ्या प्रत्येक कुटुंबाला दिल्या.



“बिया पेरल्या की भोवती एक लहानसं कुंपण बांधा हं,” जॉनीनं त्या लोकांना सांगितलं. “नाहीतर हरणं येऊन सगळी कोवळी रोपं खाऊन टाकतील. आणि हो, झाडांच्या आजूबाजूला तण माजू देऊ नका.”

बिया दिल्याबद्दल सगळेजण त्याचे आभार मानत होते खरं, पण सफरचंदाच्या झाडांची काळजी घ्यायला आपल्याला जमेल, असं काही कोणाला वाटत नव्हतं.



एक दिवस जॉनीला आणखीनच छान कल्पना सुचली. “मी ओहायोला जाणार,” त्यानं आपल्या आईबाबांना सांगितलं. “मी या लोकांसाठी सफरचंदाच्या बागा लावीन.”

“पण तिकडे तू एकटाच असशील,” त्याचे बाबा म्हणाले. “तुला घरची, मित्रांची आठवण येईल.”



“आणि असा एकटाच उठून रानावनात कसा जाणार तू?” जॉनीची आई म्हणाली. “सगळे रानटी प्राणी असतात तिकडे. बर्फाच्या वादळात सापडलास तर? आणि झोपशील कुठे?”

“मोकळ्या आकाशाखाली  झोपीन की,” जॉनी म्हणाला. “त्याहून आणखी मस्त छप्पर कुठलं?”





जॉनीच्या आईबाबांना तरीही काळजी वाटतच होती, पण त्याचा निश्चय पक्का आहे ते त्यांना दिसत होतं. त्यांनी जॉनीला सामान बांधायला मदत केली. आईनं त्याच्यासाठी एक उबदार कोट विणला आणि जेवण रांधायला आपल्याकडची सगळ्यात उत्तम कढई दिली.





सफरचंदाची दारू गाळणाऱ्या गावातल्या एका  गिरणीत जॉनी जाताजाता  थांबला. दारूसाठी त्या गिरणीत भरपूर सफरचंदं वापरली जायची. जॉनीनं त्यांच्याकडे सफरचंदाच्या थोड्या बिया मागितल्या.

“हव्या तितक्या घेऊन जा,” मालक म्हणाला.



जॉनीनं इतक्या बिया घेतल्या की,  त्या पाठीवरच्या पिशवीत मावेनात. मग त्यानं कढई डोक्यावर उपडी ठेवली.

“आता ही छान टोपी झाली,” तो स्वतःशीच म्हणाला.



त्याचा प्रवास काही सोपा नव्हता. सफरचंदाच्या बिया घेऊन जॉनी शेकडो मैल चालत गेला.

अधेमधे थांबून जॉनी एखाद्या शेतकऱ्याला सरपण तोडायला नाहीतर कुंपणाची दुरुस्ती करायला मदत करायचा. ज्या कुटुंबाना तो मदत करायचा ती कुटुंबं त्याला हमखास जेवायला थांबवून घ्यायची. लवकरच जॉनीला अनेक नवीन मित्र मिळाले.



जॉनीला आकाशातल्या ताऱ्यांखाली झोपायला आवडायचं. त्याच्या आईला तर रानटी प्राण्यांची काळजी करायचं काही कारणच उरलं नव्हतं. जंगलातल्या सगळ्या पशुपक्ष्यांना आणि कीटकांना जॉनी आवडायचा. एकदा तर भयानक हिमवादळ झालं. तेव्हा तो चक्क लाकडी ओंडक्यात झोपलेल्या एका मोठ्ठ्या अस्वलाच्या कुशीत शिरला आणि झोपून गेला.



जॉनी एकदाचा ओहायोमध्ये येऊन पोहोचला. नदीच्या काठाकाठानं त्यानं बिया पेरल्या. पेरलेल्या बियांना धक्का लागू नये म्हणून काटेरी झुडपं वापरून कुंपण तयार केलं.

मग जॉनी दुसरीकडे गेला आणि तिथे त्यानं आणखी बिया पेरल्या. पुन्हा मागे जाऊन आधीच्या रोपांची काळजी घ्यायला मात्र तो विसरला नाही.



रोपं पुरेशी मोठी झाल्यावर जॉनीनं ती उकरून काढली. लोकांना आपापल्या बागा लावता याव्यात म्हणून ती रोपं घेऊन तो त्यांच्या घरी गेला.





“थोड्याच वर्षात तुम्हाला या झाडांची सफरचंदं चाखायला मिळतील,” जॉनी म्हणाला. “वसंतात या झाडांना गुलाबी पालवी फुटेल. तुम्हाला ती ही बघता येईल. त्यांच्याइतकं सुंदर दृश्य आणखी कुठेच बघायला मिळणार नाही.”

ओहायोच्या खोऱ्यातल्या शेकडो घरांजवळ जॉनीनं झाडं लावली. लवकरच लोक त्याला "जॉनी ॲपलसीड" म्हणून ओळखू लागले.

तिथे राहणाऱ्या लोकांना तो इतरही बरीच मदत करायचा. त्यांच्या झाडांची खुंटं तोडायचा, मका लावायचा आणि त्यांच्या घरासाठी फर्निचर तयार करायचा.

ते सगळेजण जॉनीची उत्सुकतेनं वाट बघायचे.

"चला पोरांनो, हातपाय धुवून जेवून घ्या," पोरांच्या आया म्हणायच्या. "आज रात्री जॉनी ॲपलसीड येतोय आपल्याकडे !"



जॉनी ॲपलसीडनं आयुष्यभर जमेल त्या मार्गानं लोकांना मदत केली. त्याच्या मरणापूर्वी ओहायो खोरं सफरचंदाच्या पालवीनं फुलून गेलं होतं. सफरचंदाच्या बागा पाहिल्या की आजही काही लोकांना जॉनी ॲपलसीड आठवतो.



**समाप्त**